

# हेलन केलरची सखी बेले


लेखक: हॉली बेरी

चित्रे: जेनिफर थेर्मेस

मराठी अनुवाद: सुशील मेन्सन

हेलन केलरची घनिष्ट सखी होती बेले, एक कुत्री!

हेलन केलरचा जन्म झाला तेव्हा ती एक सुदृढ बालिका होती. परंतु एका गंभीर आजाराने तिला आंधळी आणि बहिरी केले. शिक्षिका ॲन सलिव्हानच्या मदतीने हेलन संवाद साधू लागली. सर्वांना हे काम अशक्यप्राय वाटत होते. जेव्हा हेलन ब्रेल वाचायला, सांकेतिक भाषा वापरायला आणि बोलायलाही शिकली तेव्हा ती संपूर्ण देशासाठी एक स्फूर्तीदायक उदाहरण ठरली. तिची सर्वात चांगली सखी एक कुत्री होती. तिचे नाव होते बेले!

या उल्लेखनीय पुस्तकातून आपण हेलनच्या विस्मयकारक आणि प्रेरणादायी प्रवासाची तसेच तिच्या प्रिय सखीची ओळख करून घेणार आहोत.





हेलन केलरचा जन्म 27 जून 1880 रोजी अमेरिकेच्या *टस्कम्बिया* शहरातील *आयवी ग्रीन* नावाच्या शेतावर झाला. ती खूप हुशार आणि गोंडस मुलगी होती. सहा महिन्यांची असतानाच ती बोलू लागली. आपल्या पहिल्या वाढदिवसाच्या आधीच ती चालू लागली.

पण सहा महिन्यांनंतर एकदा हेलनला खूप ताप आला आणि ती खूप आजारी पडली. तिने आपली दृष्टी आणि ऐकण्याची क्षमता गमावली. मग हेलनचे जग अगदी सुनेसुने आणि अंधःकारमय झाले.

आता ती आपल्या आईवडिलांशीही बोलू शकत नव्हती. तिने सुरुवातीला शिकलेले शब्द देखील ती विसरली. आपण काय विचार करत आहोत, आपल्याला काय वाटत आहे हे ती स्पष्ट करून सांगू शकत नव्हती. तिला एकाकी वाटू लागल्यामुळे ती घाबरून राहू लागली.

तिला दिलासा देऊ शकेल अशी एकच गोष्ट होती, तिचे कुत्रे. ते खूप प्रेमळ आणि मैत्रीपूर्ण होते.

ती त्यांना बघू-ऐकू शकत नव्हती, त्यांच्याशी बोलू शकत नव्हती. पण तिला याने काही फरक पडला नाही. जेव्हा जेव्हा तिला त्यांना स्पर्श करावासा वाटे, तेव्हा तेव्हा ते तिच्या जवळपास घुटमळत असत. हेलनचे कुत्रे तिचे एकनिष्ठ सोबती बनले होते.



हेलन सहा वर्षांची होती तेव्हा तिच्याकडे बेले नावाची एक शिकारी कुत्री होती. हेलन सगळीकडे तिच्या मागोमाग फिरत असे.

हेलनच्या आयुष्यातील सर्वात महत्त्वाच्या दिवशीही बेले तिच्या जवळ असे.

3 मार्च 1887 रोजी, ॲन सलिव्हान, अलाबामात हेलन आणि तिच्या कुटुंबासोबत राहायला आली. ॲन अंध लोकांच्या शाळेत एक शिक्षिका होती. ती हेलनला मदत करण्यासाठी आली होती. तिने हेलनला एका संपूर्णपणे नव्या जगाची कवाडे खुली करून दिली.

ॲनने हेलनच्या पंजाला आपल्या बोटांनी स्पर्श करून अक्षरखुणांचा संवाद कसा करायचा ते शिकवले. सुरुवातीला, हेलनला त्या शब्दांचा अर्थ समजायचा नाही.

ॲनने हेलनला एक बाहुली दिली आणि तिच्या पंजाला स्पर्श करून अक्षरखुणा केल्या d-o-l-l.

मग तिने हेलनला एक हॅट दिली आणि अक्षरखुणा केल्या h-a-t. हेलनला हे सगळे खेळासारखे वाटले.



एके दिवशी, ॲनने हेलनचा हात वाहात्या पाण्याखाली धरला. मग तिने आपल्या बोटांनी तिच्या पंजाला स्पर्श करून अक्षरखुणा केल्या w-a-t-e-r.




अखेरीस, हेलनला उमगले की *पाणी* हा असा काहीतरी थंड पदार्थ आहे, जो आपल्या हातावरून वाहात असल्याचे आपल्याला जाणवू शकते. पहिल्यांदाच हेलन एखादी वस्तू आणि ती दर्शवणारी अक्षरे हा संबंध जोडू शकली.



ज्या क्षणी हेलनने पहिला शब्द शिकला, त्या क्षणापासून तिचे अंध:कारमय जग प्रकाशाने भरून गेले. ती एकाच दिवसात तब्बल तीस शब्द शिकली.

हेलनने बेलेच्या छोट्याशा पंजाला आपल्या बोटांनी स्पर्श करून तिला अक्षरखुणा शिकवायचा प्रयत्न केला. हेलन काय करत होती, हे बेलेला कळले नाही. पण हेलन आपल्याकडे लक्ष देत आहे, म्हणून तिला बरे वाटले. ती शांत बसून आपली शेपटी हलवत राहिली आणि हेलन आपल्या नवीन शब्दांचा सराव करत राहिली..



हेलनचे बरेचसे शिक्षण घराच्या बाहेर होत असे. ती आणि ॲन बेलेसोबत जंगलात दूरवर फिरायला जात. ॲन हेलनला नव्या गोष्टी समजून घ्यायला आणि शोधायला प्रोत्साहन देत असे.

एके दिवशी सकाळी हेलन ॲनला शोधत धावत धावत जिन्यावरून वर आली. ती खूप उत्तेजित दिसत होती. हेलनने dog baby (कुत्र्याचे पिल्लू) अशा अक्षरखुणा केल्या आणि आपली पाच बोटे उंचावून दाखवली. ती काय सांगायचा प्रयत्न करत होती, हे ॲनला कळले नाही.



मग हेलनने ॲनचा हात धरून तिला बाहेर आणले. घराच्या मागे बेले आणि तिची पाच गोंडस तान्ही पिल्ले होती.



हेलन पिल्लांच्या मुलायम त्वचेवरून मायेने हात फिरवत असताना ॲनने तिला puppy (कुत्र्याचे पिल्लू) हा शब्द शिकवला. हेलनने प्रत्येक पिल्लाला स्पर्श केला आणि ॲनने अक्षरखुणा केल्या, five puppies (*पाच पिल्ले*).

एक पिल्लू इतरांपेक्षा लहान होते. हेलनने त्याला धरले आणि अक्षरखुणा केल्या small (*लहान*). मग ॲनने अक्षरखुणा केल्या very small (खूप लहान). पिल्ले चुळबूळ करू लागली तेव्हा हेलनला हसू आले. ती दुपारभर त्यांच्याशी खेळत राहिली.



जेव्हा हेलन हजारो शब्द शिकली तेव्हा ॲनने तिला ब्रेल लिपी शिकवली. ही लिपी अंध व्यक्तिंना लिखाणासाठी उपयोगी पडते. या लिपीत उठाव असलेली टिंबे असतात. ही टिंबे संख्या आणि वर्णाक्षरे दर्शवतात.

बोटांनी स्पर्श करून हेलन ही टिंबे आणि त्याद्वारे शब्द वाचायला शिकली.

हेलन दहा वर्षांची होती तेव्हा तिला आपल्या आवाजात कसे बोलायचे, हे शिकण्याची इच्छा झाली, ज्यामुळे सगळे तिला समजून घेऊ शकले असते.

Horace Mann School

1890 च्या वसंत ऋतूत ॲन हेलनला घेऊन *सारा फुल्लर*ला भेटायला बोस्टनला गेली. सारा फुल्लर बहिऱ्या मुलांच्या *होरेस मान* शाळेची प्रिन्सिपल होती.



सारा हेलनला स्वतःच्या आवाजात बोलायला शिकवण्याचा प्रयत्न करू लागली. हेलन साराच्या ओठांना स्पर्श करून त्यांची हालचाल समजून घेऊ लागली. मग हेलन ते शब्द बोलायचा प्रयत्न करू लागली. शब्द ऐकू येत नसल्याने आणि सारा दिसत नसल्याने तिला हे खूप कठीण गेले.

कित्येक तासांच्या सरावानंतर, हेलनने तिचे पहिले वाक्य म्हटले:

“हे उबदार आहे.”

ॲन आणि हेलन घरी परतले तेव्हा तिच्या आईवडिलांनी आणि लहान बहीण *मिल्ड्रेड*ने त्यांचे स्वागत केले.

हेलनने आपल्या लाडक्या कुत्रीला हाक मारली, “बेले, ये!”

बेले धावतच हेलनजवळ आली आणि तिचे हात चाटू लागली. त्या क्षणी हेलनला आनंदाचे भरते आले. आता बेलेसुद्धा तिचा आवाज समजू शकत होती!



हेलनला आयुष्यभर कुत्र्यांविषयी ममत्व वाट राहिले. ती लहान असताना तिच्या कुटुंबात *त्रिश* नावाचा कुत्रा होता. हेलनची आवडती बेले ही एक आयरीश कुत्री होती.

"द स्टोरी ऑफ माय लाईफ" या आत्मचरित्रात हेलनने लिहिले आहे की बेले तिची घनिष्ठ मैत्रीण होती. तिने बेलेला शब्दखुणा शिकवायचा खूप प्रयत्न केला. ॲन सलिव्हानला हेलनची कुत्र्यांप्रती असलेल्या प्रेमाची जाणीव झाली. अलाबामाला आल्यावर दोन महिन्यांनी, ॲनने आपल्या एका मित्राला पत्र लिहिले. त्यात तिने हेलनला पिल्ल्यांचा शोध लागल्यावर झालेल्या आनंदाचे वर्णन केले.

कित्येक वर्षांनी, रेडक्लिफ कॉलेजात हेलनने यशस्वीपणे परीक्षा दिली, म्हणून तिच्या वर्गबांधवांनी तिला एक *बोस्टन टेरियर* कुत्रा बक्षीस दिला. हेलनला तो खूप आवडला. तिने त्याचे नाव *फिज* ठेवले.

1937 साली, हेलन व्याख्यान देण्यासाठी जपानला गेली. तिथे तिला *अकिता* प्रजातीचा जपानी कुत्रा आवडला. कुत्र्याच्या मालकाने एक कुत्रा भेट म्हणून दिला. हेलनने त्याचे *कामिकेझ गो* असे नामकरण केले. अकिता प्रजातीचा कुत्रा अमेरिकेत आणणारी हेलन ही पहिलीच व्यक्ती होती.

कामिकेझ गो याची थोड्याच काळात आपला भाऊ *केनझान गो* याच्याशी भेट झाली. दोन्ही कुत्र्यांनी हेलनच्या मनात विशेष जागा पटकावली.

आपल्या संपूर्ण आयुष्यात हेलनने ग्रेट डेन्स, मास्टीफ, जर्मन शेफर्ड, शेटलँड केलीस, आयरीश व इंग्लिश सेटर्स, स्प्रिंगर स्पॅनिअल्स, बोस्टन टेरियर, बुल टेरियर, अकितास, स्कॉटीश टेरियर, डॅकशंड्स आणि मिश्र प्रजातीचे अनेक कुत्रे पाळले. या कुत्र्यांसोबत काढलेले हेलनचे अनेक फोटो पाहायला मिळतात.

हेलनला कुत्र्यांचे विनाअट प्रेम, निष्ठा आणि मैत्री हे गुण फारच भावले. त्यांनी तिला आयुष्यभर आनंदच दिला. आपल्या आत्मचरित्रात ती म्हणते, "माझे हे मित्र माझ्या मर्यादा जाणतात. मी एकटी असताना ते नेहमी माझ्याजवळ राहातात. त्यांची माया करण्याची पद्धत आणि शेपटीची हालचाल मला खूप आवडते. त्यांची खेळकर मैत्री मला खूप सुख देते.



1900 साली, हेलनने मॅसेच्युसेट्स राज्यातील *केंब्रिजच्या* रेडक्लिफ कॉलेजात शिक्षण घेतले. वर्गात प्राध्यापक जे शिकवत ते ॲन तिच्या पंजावर अक्षरखुणा करून समजावत असे. कॉलेजात असतानाच, हेलनने आपले आतमचरित्र द स्टोरी ऑफ माय लाईफ लिहिले. हे पुस्तक 1930 साली प्रकाशित झाले आणि जगभरात बेस्ट सेलर ठरले. त्याची अफाट विक्री झाली. एका वर्षानंतर, हेलनने सन्मानपूर्वक पदवी प्राप्त केली. पुस्तक लिहिणारी आणि पदवी मिळवणारी ती पहिलीच बहिरी आणि अंध व्यक्ती होती.

मग हेलन आपल्या आयुष्याविषयी लिहू लागली, व्याख्याने देऊ लागली. ॲनसोबत तिने देशभर प्रवास केला आणि बहिऱ्या, अंध मुलांना शिक्षित करण्याविषयी व्याख्याने दिली. हेलनने अंध मुलांसाठी चांगल्या शाळा आणि ग्रंथालये उभारण्याची शिफारस केली.

1936 साली, ॲनच्या मृत्यूनंतर, हेलन दुसऱ्या एका सहकाऱ्यासोबत प्रवास करत राहिली. तिने अपंग लोकांविषयी लोकांना जागृत करण्यासाठी आणि निधी जमवण्यासाठी 39 देशांचे दौरे केले. तिने अपंगांना हक्क – चांगले शिक्षण, चांगल्या संधी आणि रोजगार – मिळावे म्हणून अविरत काम केले. हेलनने अंध लोकांसाठी अमेरिकी फाउंडेशनसोबत 40 वर्षे काम केले. तिच्या या सेवेसाठी तिला अनेक पुरस्कार मिळाले. 1964 साली, अध्यक्ष *लिंडन जॉन्सन* यांनी तिला प्रेसिडेन्शियल मेडल ऑफ फ्रीडम या अमेरिकेच्या सर्वोच्च नागरी पुरस्कार परस्काराने सन्मानित केले.

हेलन वयाच्या 81 वर्षांपर्यंत काम करत राहिली. सहा वर्षांनी, जून 1968 मध्ये झोपेत असतानाच तिचा मृत्यू झाला. हेलन एक उल्लेखनीय स्त्री होती. तिने गरजू लोकांना मदत करण्यासाठी आपले आयुष्य समर्पित केले. ती आजही लोकांना सदोदीत स्फूर्ती देते.